**हा शासन निर्णय कारागारातून देय नाही.**

**<u>आदिवासींना कर्जमाफी योजना अंमलबजावणीनंतर</u>**
**शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ मर्या. नाशिक यांना त्यांचेमार्फत राबविण्यात येणा-या स्वयंरोजगारांच्या योजनांसाठी अर्थसहाय्य सन २००९-१०.**

**महाराष्ट्र शासन**
आदिवासी विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक-शआवि-२००९/प्र.क्र.११५/का.३
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक :- ३० मार्च, २०१०.

**प्रस्तावना :-** शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ मर्या. नाशिक या महामंडळाची निर्मिती शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग,क्र.आविम-२३९६/४५/प्र.क्र.३९/का-३, दिनांक ९ डिसेंबर, १९९८ अन्वये करण्यात आली असून सदर महामंडळाचे कंपनी कायदा,१९५६ नुसार जानेवारी, १९९९ मध्ये नोंदणीकृत करण्यात आली आहे. शबरी महामंडळाचे अधिकृत भाग भांडवल रुपये १००.०० कोटी असून ५१ टक्के राज्य शासन तर ४९ टक्के केंद्र शासनाकडून उभारावयाचे आहे. त्यानुसार राज्य शासनाकडून रुपये २८.२३ कोटी व केंद्र शासनाकडून रुपये ०.५२ कोटी भाग भांडवल उपलब्ध करुन देण्यात आले आहे. या महामंडळामार्फत स्वयंरोजगार निर्मितीसाठी कर्ज योजना राबविण्यात येतात. या कर्ज योजनांसाठी ७५ टक्के कर्ज हिस्सा हा राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त व विकास महामंडळ, नवी दिल्ली यांचेकडून ४ व ६ टक्के व्याजावर उपलब्ध होते. योजना राबवितांना शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळाकडून मार्जिन मनी म्हणून १५ टक्के हिस्सा व लाभार्थी हिस्सा १० टक्के अशा रितीने कर्ज आदिवासी लाभार्थ्यांना स्वयंरोजगार निर्मितीसाठी उपलब्ध करुन देण्यात येते. तसेच काही योजनांना राष्ट्रीयकृत बँकाकडून देखिल अर्थसहाय्य करुन योजना राबविण्यात येतात. सदरचे कर्ज हे लाभार्थ्यांना ६ ते ८ टक्के व्याज दराने उपलब्ध करुन देण्यात येते. सदर कर्ज व्याजासह पाच वर्षाच्या कालावधीकरीता असून त्याच कालावधीत ते वसूल करण्यात येते. लाभार्थ्यांकडून कर्जाची वसूली टप्पाटप्याने झाल्यानंतर राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त व विकास महामंडळ, नवी दिल्ली तसेच राष्ट्रीयकृत बँक व शबरी महामंडळ यांच्याकडून उपलब्ध झालेल्या कर्जाची परतफेड सव्याज केली जाते.

शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ मर्या. नाशिक यांना स्वयंरोजगारासाठी राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त व विकास महामंडळ, नवी दिल्ली यांचेकडून रु. ४४.३९ कोटी निधी उपलब्ध झाला त्यातून दि. ३१-३-२००८ पर्यन्त रु. ३५.८९ कोटी निधी हा राज्य शासनाच्या १५ टक्के मार्जिन मनी निधी बरोबर आदिवासी लाभार्थ्यांना वितरित केला. दिनांक ३१ मार्च,२००८ अखेर राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त व विकास महामंडळ, नवी दिल्ली यांना कर्जाची परतफेड रु. २४.७७ कोटी प्रत्यक्ष झाली असून रु. २४.८७ कोटी ही कर्जाची थकीत रक्कम आहे. महामंडळाने दि.१-४-२००८ नंतर रु. १७.०७ कोटीचे कर्ज वितरण केले आहे.

महामंडळाला राज्य शासनाने जे भाग-भांडवल दिले ते पूर्णत: विनियोगात आले असा महामंडळाचा अहवाल आहे. राज्य शासनाने उपलब्ध करुन दिलेला भाग-भांडवलाचा तपशिल खालीलप्रमाणे :-

( रु. लाखात )

| अ.क्र. | भाग-भांडवलाचा हेतू | प्राप्त निधी | खर्च/वापर | शिल्लक |
|---|---|---|---|---|
| १ | मार्जिन व भांडवल | १५००.०० | १४८२.६४ | १७.३६ |
| २ | संगणक | ४६.०० | - | ४६.०० |
| ३ | जमिन खरेदी | ५०.०० | - | ५०.०० |
| ४ | परतावासाठी अर्थसहाय | ३५०.०० | ३५०.०० | - |
| ५ | मार्जिन मनी | ८७७.१६ | ८७७.१६ | - |
| **एकूण** | | **२८२३.१६** | **२७०९.८०** | **११३.३६** |

राज्य शासनाने उपलब्ध करुन दिलेल्या भाग-भांडवलातून मिळालेल्या निधीचा निश्चित वापर कशासाठी केला याचे उत्तर देतांना महामंडळाने रु. १२००.०० लाख राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त व विकास महामंडळ, नवी दिल्ली याना केलेल्या परतफेडीसाठी वापरले. तर रु. ११२.३३ लाख भाग-भांडवल स्वनिधी कर्ज योजनेसाठी, रु. १०२.६६ लाखाचा निधी मिटकॉनसाठी, उर्वरित रक्कम राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त व विकास महामंडळ, नवी दिल्ली यांच्या रु. ३५८९.०० लाख व दि. १/४/२००८ नंतरच्या रु. १७०७.०० लाख कर्ज वितरणासाठी १५ टक्के मार्जिन म्हणून वापरला. त्यामुळे केवळ रु. ११३.३६ लाख शिल्लक आहे असा अहवाल महामंडळाने दिला आहे. याच अहवालात राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त व विकास महामंडळ, नवी दिल्ली यांचेकडून सन २००९-१० मध्ये केंद्रीय अर्थसहाय्य उपलब्ध न झाल्याने एकूण रु. ३०७.४३ लाखाचे कर्ज वाटप राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त व विकास महामंडळ, नवी दिल्ली यांचेकडून निधी येण्यापूर्वीच वितरित झाल्याचे महामंडळाने स्पष्ट केले आहे. महामंडळाने दि.२३ ऑक्टोबर,२००९ च्या पत्रान्वये रु. २८२४.३३ लाखाची भाग-भांडवलाची मागणी नोंदविली आहे.

महामंडळाने डिसेंबर, २००९ मध्ये अधिवेशनासाठी पुरवणी मागणी सादर केली होती परंतू खर्च योजनांतर्गत असल्याने सहमती देता आली नव्हती. तसेच पुनर्विनियोजनाच्या मर्यादा लक्षात घेता व लागणारी रक्कम मोठी असल्याने व आदिवासींचे व्यापक हित लक्षात घेवून राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त व विकास महामंडळ, नवी दिल्ली (NSTFDC) यांना कर्जमाफीनंतर प्रतिपूर्ती करावयाचा भाग म्हणून व Over due झालेली रक्कम रू. १०.१४ कोटी एवढा निधी शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ यांचेकडील शिल्लक संचित निधीतून परतफेड करण्याच्या प्रस्तावास किमान महामंडळातील संचित निधी या प्रयोजनार्थ उपलब्ध करून देता येईल का हे पाहण्यास व्यवस्थापकिय संचालक यांना सूचविण्यात आले होते. २५/११/२००९ रोजी अशी सहमती महामंडळाने दिलेली आहे.

महामंडळाने रु. १०१४.०० लाख एन.एस.टी.एफ.डि.सी.ला ओव्हरडयू कर्जाची रक्कम परतफेड न केल्यामुळे सुमारे रु. ३०.०० कोटीचा निधी मिळालेला नाही. या स्थितीत हे रुपये १०१४.०० लाख निधी महामंडळास वितरीत करावा लागेल. जोपर्यंत महामंडळाचे प्रशासन ठोस उपाय योजना करीत नाही तोपर्यंत

भरीव अर्थ सहाय्य करण्याऐवजी महामंडळ कामकाज करु शकेल असे सहाय्य अथवा खर्चाची परवानगी देण्याची गरज प्रकर्षाने भासते.

याचा भाग म्हणून महामंडळाकडे असलेल्या शिल्लकीचा गोषवारा मागविला होता. त्यांच्या उत्तरात महामंडळाने खालील बाबी स्पष्ट केल्या आहेत.

| अ.क्र. | निधी कोठे आहे | निधीचा तपशिल |
|---|---|---|
| १ | **शाखा कार्यालयांकडे** | **रु. १०७.०० लाख** |
| २ | बँक खाते | रु. ९३.६५ लाख |
| ३ | मुदत ठेवीमध्ये | रु. ११२०.०० लाख |
| | **मुख्य कार्यालयाकडे** | **रु. १२१३.६५ लाख** |

महामंडळाने तपशिल देतांना मुख्यालयात असणाऱ्या एकूण शिल्लक निधी रुपये १२.१३ कोटीचा तपशिल मागविला असता त्यात खालील बाबी समाविष्ठ आहे असे स्पष्ट केले आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | **केंद्र निधी** | **रु. ५२.०० लाख** |
| २ | **विशेष हेतू राज्य निधी** | **रु. ९६.०० लाख** |
| ३ | **शिल्लक राज्य मार्जीन निधी** | **रु. १६०.३९ लाख** |
| ४ | **मुदत ठेवीवरील व्याज चालु वर्षाचे** | **रु. ८१.१४ लाख** |
| ५ | **भाग भांडवल परतावा (संचित निधी)** | **रु. ८०६.७५ लाख** |

यातील भागभांडवल परतावा निधी तरतूद संचित निधीचा भाग आहे, म्हणून त्याच्या व मार्जीनमनी वसुलीच्या अथवा चालु व्याजाच्या निधीतून रु.१०१४.०० लाख राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त व विकास महामंडळ, नवी दिल्ली यांना भरण्यास वित्त विभागाच्या सल्ल्याने परवानगी दिल्यास महामंडळाचे कामकाज सुरु राहील असा निर्णय घेण्यात येत आहे.

राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त व विकास महामंडळ, नवी दिल्ली यांना परतावा वेळीच गेला नाही, तर राज्य सरकार रक्कम भरते हा संकेत आहे. या कर्जावर शासन हमी आहे व हमी शुल्क महामंडळाने वेळोवेळी भरले आहे. राज्य शासनाने सहाय्य द्यावे यासाठी महामंडळाचा लेखी प्रस्ताव आहे. आज महामंडळाचे सुमारे रु. ३०.०० कोटी पर्यंतचा निधी राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त व विकास महामंडळ, नवी दिल्लीकडून येणे अपेक्षित आहे, त्यामुळे आदिवासींना स्वयंरोजगाराच्या संधी उपलब्ध करुन देता येतील. महामंडळास राज्य सरकारने अर्थ सहाय्य द्यावे अशी विनंती केंद्र शासनाने देखिल केलेली आहे.

उपरोक्त बाबी लक्षात घेऊन किमान महामंडळाला अन्य स्त्रोतातून निधी देण्याऐवजी त्यांचेकडे असलेल्या संचित भागभांडवल परतावा निधी व चालु वर्षाचे व्याज या एकत्रित निधीमधून रु. १०१४.०० लाख राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त व विकास महामंडळ, नवी दिल्ली यांना अदा करावे व अल्पमुदत

ठेवीच्या रोखीकरणाने किमान आजची गरज भागवावी असा निर्णय महामंडळास वित्त विभागाच्या अनुमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

उर्वरित निधी हा माहे मार्च, २०१० मध्ये निधी वितरणाचा निर्णय महामंडळाची सुधारणा पाहून व कार्यपध्दतीतील अपेक्षित बदल पाहून घेतला जाईल. या संदर्भात महामंडळाने शासन हमी व राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त व विकास महामंडळ, नवी दिल्ली यांच्या अंमलबजावणीच्या अचुकता पाळल्या जातील याची लेखी ग्वाही शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळाच्या प्रशासनाने द्यावी या संदर्भात आज आदिवासी विकास विभागाने एन.एस.टी. एफ.डी. सी. अंतर्गत येणा-या स्वयंरोजगाराच्या योजनांच्या निधीचा विनियोग पात्र व गरजवंत सिमांतिक आदिवासी लाभार्थ्यांना जास्तीत जास्त कसा उपलब्ध करुन देता येईल अशा योजना शबरी आदिवासी विकास महामंडळाने प्रस्तावित कराव्यात. याबाबत सविस्तर सूचना सोबत सहपत्र- अ नुसार देण्यात आलेल्या आहेत त्याचे कटाक्षाने पालन करावे व तसा प्रस्ताव शासनास अवगत करावा. आता शबरी महामंडळाची विनंती लक्षात घेऊन वित्त विभागाच्या मान्यतेने शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-** शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ मर्या. नाशिक या महामंडळाकडे असलेल्या संचित भागभांडवल परतावा निधी व चालु वर्षाचे व्याज या एकत्रित निधीमधून रु. १०१४.०० लाख एवढा निधी राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त व विकास महामंडळ, नवी दिल्ली यांना अदा करावा व अल्पमुदत ठेवीच्या रोखीकरणाने किमान आजची गरज भागवावी असा निर्णय महामंडळास वित्त विभागाच्या अनुमतीने निर्गमित करण्यात येत आहे. यासाठी कोषागारातून कोणतीही रक्कम काढण्याची आवश्यकता नाही. या निर्णयाचा प्राधिकार म्हणून वापर करुन व्यवस्थापकीय संचालक यांनी ही रक्कम राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त व विकास महामंडळ, नवी दिल्ली यांना रु. १०१४.०० लाख ( रु. दहा कोटी चौदा लाख फक्त ) एवढा निधी त्वरित वित्त प्रेषीत करावा व केलेल्या कार्यवाहीचा अहवाल प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग यांना सादर करावा.

२. याचबरोबर राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त व विकास महामंडळ, नवी दिल्ली यांचेकडून भविष्यात मिळणारा निधी व त्याचा झालेला विनियोग यांचा दरमहा अहवाल शासनास सादर करावा. निधी प्राप्त झाल्यानंतर त्याचा विनियोग करतांना महाराष्ट्र शासनाने दिलेल्या हमीचे व राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त व विकास महामंडळ, नवी दिल्ली यांच्या निदेशाचे उल्लंघन झाल्यास महामंडळ व व्यवस्थापकीय संचालक हे जबाबदार राहतील. तसे होऊ नये याची दक्षता म्हणून संचालक मंडळाच्या प्रत्येक सभेत आढावा घ्यावा असे निदेशित करण्यात येत आहे. व्यवस्थापकीय संचालक, शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ यांनी याबाबतचा सर्वंकष अहवाल वेळोवेळी सादर करावा.

३. हा आदेश कोषागारात देय नाही याची नोंद घ्यावी व कोणत्याही प्रकारे रक्कम कोषागारातून आहरित होणार नाही याची दक्षता व्यवस्थापकीय संचालक, शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ मर्या. नाशिक यांनी घ्यावी .

३. सदर शासन निर्णय हा वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक १५४/व्यय-१४/१० दिनांक २९-३-२०१० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१००३३०२३४२५४००१असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(भ. प्र. सिंह)
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
४) मा. सर्व मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
५) मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक
६) मा. अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त व विकास महामंडळ,नवी दिल्ली.
७) सर्व मंत्रालयीन विभागाचे अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव /सचिव
८) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
९) व्यवस्थापकीय संचालक, शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ मर्या.. नाशिक.
१०) महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र.१/२, मुंबई/नागपूर.
११) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र , मुंबई/नागपूर.
१२) वित्त विभाग ( साऊ) (व्यय-१४) मंत्रालय, मुंबई .३२.
१३) नियोजन विभाग (का. १४३१) मंत्रालय, मुंबई-३२.
१४) संचालक, लेखापरिक्षा, ऑफिस ऑफ दि डायरेक्टर, ऑडिट सायंटिफिक ॲन्ड कमर्शियल डिपार्टमेंट, १०१, महर्षि कर्वे रोड, मुंबई-४०० ०२०.
१५) क.अ. (का-१, ६ व ७), आदिवासी विकास विभाग,मंत्रालय, मुंबई-३२.
१६) निवड नस्ती (का-३),आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.

**शासन निर्णय क्रमांक-शआवि-२००९/प्र.क्र.११५/का.३ दिनांक :- ३० मार्च, २०१०.चे सहपत्र-अ**

## राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त व विकास महामंडळ, नवी दिल्ली पुरस्कृत स्वयंरोजगार योजना राबविण्याबाबत मार्गदर्शक सूचना.

**शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळाने तातडीने करावयाची कार्यवाही :-**

शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळाच्या योजना राबवितांना अनेक अनियमितता व तक्रारी झाल्याचे निदर्शनास आलेले आहे. या संदर्भात वारंवार सूचना देवूनही अनियमितताबाबत खुलासे आलेले नाहीत किंवा त्याची वित्तीय व्याप्ती दर्शविणारी सविस्तर टिप्पणी सुध्दा व्यवस्थापकीय संचालकांनी सादर केलेली नाही. या पार्श्वभूमीवर व्यवस्थापकीय संचालक, शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ यांनी खालील मुद्दयांचा अहवाल व कार्यवाहीचे अनुपालन अहवाल त्वरित सादर करावेत.

१. राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त व विकास महामंडळ, नवी दिल्ली यांचेकडून निधी न येता सुध्दा मोठया प्रमाणात कर्ज वितरण झाल्याचे निदर्शनास आले आहे. असे प्रकार पुढे घडू नयेत याचे नियोजन करावे व आता प्राप्त होणा-या राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त व विकास महामंडळ, नवी दिल्ली यांचेकडील निधीमधून १-४-२००८ नंतर निधी नसतांना जे वाटप झाले त्याचे कोणतेही प्रदान महामंडळाने परस्पर करु नये. तसेच राज्य शासनाचे भाग-भांडवली अंशदान, त्यावरील जमा झालेले व्याज अथवा शबरी महामंडळाकडील कोणतीही जमा रक्कम राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त व विकास महामंडळ, नवी दिल्ली यांचे कर्ज फेडीसाठी वापरली जाणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच या योजनेतंर्गत जमा झालेले बँक व्याज शासनाच्या अनुमती शिवाय वापरले जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

२. दिनांक १-४-२००८ नंतर निधी नसतांना जर प्रदान करण्यात आले असल्यास ती कोणत्या परिस्थितीत झाली त्याचा स्वयंस्पष्ट अहवाल सादर करावा. हा अहवाल प्रमाणकनिहाय असावा.

३. दि.१-४-२००८ नंतर वितरण झाले परंतु अद्याप प्रदान झाले नाही अशी प्रकरणे असल्यास त्याचा बाबनिहाय खुलासा शासनास सादर करावा.

४. शासनाकडून निधी येण्यापूर्वी गरीब बेरोजगार आदिवासी युवकांकडून नियमबाहय पध्दतीने अथवा निधी येण्यापूर्वी अनियमितपणे आदिवासी युवकांकडून लाभार्थी हिस्सा महामंडळाच्या अधिका-यांनी वसूल केला असल्यास किंवा भरुन घेतला असल्यास त्याचा तपशील द्यावा. हे करतांना यातील किती लाभार्थ्यांना दिलेल्या कर्ज वस्तुंचे महामंडळाने नियमबाहय प्रदान केले ते नमूद करावे व किती लाभार्थ्यांच्या दिलेल्या कर्ज वस्तुंचे अद्यापपर्यन्त प्रदान करणे बाकी आहे याचा खुलासा शाखानिहाय सादर करावा. अशा प्रकरणात लाभार्थीकडून त्यांचा हिस्सा म्हणून किती निधी जमा करण्यात आला व त्यामुळे किती दायित्वे शासनावर लादली गेली याचा खुलासा करावा व त्यासाठी जबाबदार कोण हे स्पष्ट करावे.

५. दि. १-४-२००८ ते आजतागायत राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त व विकास महामंडळ, नवी दिल्ली यांचा निधी प्रत्यक्षात न मिळता जर काही वितरण झाले असल्यास त्यातील कोणतेही प्रदान शासनाची मान्यता घेतल्याशिवाय करु नये.

६. यापुढे राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त व विकास महामंडळ, नवी दिल्ली यांचेकडील निधी प्राप्त झाल्यानंतर कोणत्या योजना व उद्दिष्टासाठी वापरला जाईल याचा प्रस्ताव मंजुरीसाठी शासनास सादर करावा.

७. यापुढे राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त व विकास महामंडळ, नवी दिल्ली यांचेकडून वेळोवेळी मिळालेले कर्ज वितरणाचे निदेश व राज्य शासनाने दिलेली हमीची सर्व तत्वे व अटी यांचे कटाक्षाने पालन व्हावे. भविष्यात अचूकता आणण्यासाठी महामंडळाने खालील निर्देश सक्तपणे पाळावेत.

**शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळाने कायम स्वरुपी करावयाची कार्यवाही :-**

१. राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त व विकास महामंडळ, नवी दिल्ली पुरस्कृत स्वंयरोजगाराच्या मंजूर कर्ज योजनांसाठी दिलेल्या उद्दिष्टनिहाय व प्राप्त निधीनुसार योजना राबविण्यात याव्यात.

२. स्वंयरोजगाराच्या कर्ज योजना राबवितांना एका योजनेचा निधी अन्यत्र वापरला जाणार नाही त्याचबरोबर याप्रयोजनार्थ निधी उपलब्ध नसल्यास कोणताही खर्च होणार नाही याची व्यवस्थापकीय संचालक यांनी व्यक्तीशः दक्षता घेण्यात यावी.

३. योजनांचा प्रस्ताव राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त व विकास महामंडळ, नवी दिल्ली यांना सादर करतांना दारिद्रय रेषेखालील पात्र व गरजवंत सिमांतिक आदिवासी लाभार्थ्यांना जास्तीत जास्त लाभ कसा उपलब्ध करुन देता येईल अशा योजना शबरी आदिवासी विकास महामंडळाने प्रस्तावित कराव्यात. अशा योजना केंद्र शासनास अथवा राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त व विकास महामंडळ, नवी दिल्ली यांना सादर करतांना आदिवासी विकास विभागाची सहमती घ्यावी.

४. राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त व विकास महामंडळ, नवी दिल्ली यांचेकडून भविष्यात मिळणारा निधी व त्याचा झालेला विनियोग याचा दरमहा अहवाल शासनास सादर करावा.

५. निधी प्राप्त झाल्यानंतर त्याचा विनियोग करतांना महाराष्ट्र शासनाने दिलेल्या हमीचे व राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त व विकास महामंडळ, नवी दिल्ली यांच्या निदेशाचे उल्लंघन झाल्यास महामंडळ व व्यवस्थापकीय संचालक हे व्यक्तीशः जबाबदार राहतील. तसे होऊ नये याची दक्षता म्हणून महामंडळाच्या संचालक मंडळाच्या प्रत्येक सभेत आढावा घ्यावा असे निदेशित करण्यात येत आहे. याबाबतचा सर्वंकष अहवाल व्यवस्थापकीय संचालक, शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ यांनी वेळोवेळी सादर करावा.

६. आवश्यकता भासल्यास राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त व विकास महामंडळ, नवी दिल्ली पुरस्कृत योजना राबवितांना तसेच प्राप्त निधी विनियोगात आणतांना लाभार्थीचा हिस्सा व राज्य सरकारचा मार्जिनमनी यांचा निधी उपलब्ध असेल तरच कर्ज प्रकरणे मंजूर करावीत.

७. महालेखापालांचे वेळोवेळी आलेले निर्देश लक्षात घेता योजनानिहाय उद्दिष्टांची आकडेवारी अंतीम करतांना असे वितरण संपूर्ण महाराष्ट्रात होईल याप्रमाणे करावे. केवळ एक किंवा दोन जिल्हयांना प्राधान्य देवू नये असे उद्दिष्टे अंतिम करतांना लोकसंख्या व मागासलेपणा या बाबीं विचारात घेण्यात याव्यात. हे करतांना राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त व विकास महामंडळ, नवी दिल्ली पुरस्कृत योजनांच्या

अंमलबजावणीचे सर्व निर्देश कटाक्षाने पाळावेत. NSTFDC नवी दिल्ली पुरस्कृत Sector निहाय योजना (विशेषतः कृषि, सेवाक्षेत्र व उद्योग) असतात व योजना निहाय आर्थिक व भौतिक उद्दिष्टे असतात. Sector निहाय व योजना निहाय लाभार्थींची निवड करीत असतांना त्या Sector मध्ये स्वयंरोजगारासाठी आदिवासी विकास विभागाकडून दिले जाणा-या प्रशिक्षण योजनेतील यशस्वी प्रशिक्षणार्थी यांची निवड प्राधान्याने करावी. यामुळे दारिद्रय रेषेखालील युवकांना दिल्या जाणा-या प्रशिक्षणाचा अर्थपूर्ण लाभ होईल व शासनाचा हेतू सफल होईल.

८. योजना सादर करतांना उपलब्ध स्थानिक कच्चा माल, एतदेशीय व पारंपारिक कौशल्य तंत्रज्ञान यासाठी विकासाच्या संधीचा आर्थिक सहभाग याबाबत आदिवासी विकासाच्या राज्य सरकारच्या धोरणानुसार प्राधान्य द्यावे.

९. राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त व विकास महामंडळ, नवी दिल्ली पुरस्कृत योजनांसाठी प्रशिक्षण योजना उपलब्ध होऊ शकतात ही बाब तपासून त्याचा समावेश प्रस्तावित योजनात होईल याची दक्षता घ्यावी. अशा योजना महाराष्ट्रातील आदिवासी लाभार्थ्यांना मोठया प्रमाणात उपलब्ध करुन द्याव्यात.

१०. राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त व विकास महामंडळ, नवी दिल्ली पुरस्कृत योजनांमार्फत जे कर्ज वितरण होईल त्या अनुषंगाने महामंडळ लाभार्थी करारनामा, हमीदाराचा करारनामा, जामीनदाराचा करारनामा व वसुलीसाठी आवश्यक असणारी सर्व कागदपत्रे कर्ज वितरणापूर्वी घेतले जातील याची दक्षता घेण्याच्या सूचना संबंधितांना देण्यात याव्यात.

११. राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त व विकास महामंडळ, नवी दिल्ली पुरस्कृत योजनांचे कर्ज वितरण झाल्यानंतर विहित पध्दतीने वसुली होत राहील याचे नियोजन करावे व विहित वसुलीचा भरणा यावर नियंत्रण ठेवावे यामध्ये दिरंगाई अथवा दुर्लक्ष आढळून आल्यास योग्य ती कार्यवाही करण्याचे प्राधिकार सुध्दा संबंधित अधिका-यांना द्यावेत.

१२. राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त व विकास महामंडळ, नवी दिल्ली पुरस्कृत योजनेसाठीचा राज्य हिस्सा यापुढे स्वीय प्रपंजी लेखा ( PLA ) माध्यमातून दिला जाणार असल्याने सर्व लेखे व नोंदवहया अचूक ठेवाव्यात याचबरोबर महामंडळाने कोषागारे यातील व्यवहार व राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त व विकास महामंडळ, नवी दिल्ली पुरस्कृत योजनांच्या केंद्र निधीचा बँकेतील व्यवहार याचे दरमहा ताळमेळ घालावा अशा सूचना मुख्यालयाबरोबर शाखा कार्यालयांना सुध्दा देण्यात याव्यात.

१३. राष्ट्रीय अनुसूचित जमाती वित्त व विकास महामंडळ, नवी दिल्ली पुरस्कृत योजना राबवितांना निधी अन्य प्रयोजनार्थ वापरला जाणार नाही याची व्यक्तीशः दक्षता घ्यावी.

***********